**शासकीय कर्मचाऱ्यांच्या नियतकालिक**
**बदल्यासंदर्भात धोरण.**

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक,क्रमांक:टिआरएफ-२००५/प्र.क्र.२/०५/१२,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १६ एप्रिल,२००५.

संदर्भ :- १) शासन परिपत्रक,क्रमांक:एसआरव्ही-१०९७/प्र.क्र.२०/९७/१२,
दिनांक २७ नोव्हेंबर,१९९७.
२) शासन परिपत्रक,क्रमांक:एसआरव्ही-१०९७/प्र.क्र.२०/९७/१२,
दिनांक ७ फेब्रुवारी,१९९८.
३) शासन परिपत्रक,क्रमांक:टिआरएफ-२००५/प्र.क्र.२/०५/१२,
दिनांक १६ फेब्रुवारी,२००५.

# परिपत्रक

शासकीय कर्मचाऱ्यांच्या नियतकालिक बदल्या वर नमूद केलेल्या दिनांक २७ नोव्हेंबर,१९९७ आणि ७ फेब्रुवारी,१९९८ च्या परिपत्रकाद्वारे विहित केलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार करण्यात याव्यात असे निदेश समक्रमांकाच्या वर नमूद केलेल्या दिनांक १६ फेब्रुवारी,२००५ च्या परिपत्रकाद्वारे देण्यात आलेले आहेत. दि.२७ नोव्हेंबर,१९९७ च्या परिच्छेद-१४ मध्ये विहित केलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार "ज्या प्रकरणी शासनाच्या प्रचलित धोरणाशी सुसंगत नसेल, अशी बदली करण्याचे प्रस्तावित केले असल्यास त्यात मा.मुख्यमंत्री स्तरावर मान्यता घेतल्यानंतरच बदली करण्यात यावी. मा.मुख्यमंत्र्यांची मान्यता असल्याखेरीज केलेल्या बदलीचे उत्तरदायित्व संबंधित सचिवांवर असेल" असे निदेश देण्यात आलेले आहेत. तथापि काही विभागाच्या बदल्यांच्या प्रकरणात असे निदर्शनास आले आहे की, उपरोक्त धोरणाशी सुसंगत नसलेल्या बदल्या मा.मुख्यमंत्री महोदयांच्या मान्यतेशिवाय करण्यात आलेल्या आहेत. अशा बदल्या मा.मुख्यमंत्री महोदयांच्या मान्यतेशिवाय करणे ही गंभीर बाब आहे. त्यामुळे दि.२७ नोव्हेंबर,१९९७ च्या परिपत्रकामधील परिच्छेद १४ मध्ये नमूद केल्याप्रमाणे ज्या प्रकरणी शासनाच्या प्रचलित धोरणाशी सुसंगत नसेल, अशी बदली करण्याचे प्रस्तावित केले असल्यास त्यास मा.मुख्यमंत्री स्तरावर मान्यता घेतल्यानंतरच ती बदली करण्यात यावी असे निदेश पुन: एकदा सर्व मंत्रालयीन विभागांच्या सचिवांना देण्यात येत आहेत. मा.मुख्यमंत्र्यांची अशा प्रस्तावास मान्यता असल्याखेरीज केलेल्या बदल्यांचे उत्तरदायित्व संबंधित सचिवांवर असेल हे पुन: एकदा सर्व सचिवांच्या निदर्शनास आणण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**(चारुशीला सोहोनी)**
**प्रधान सचिव(सेवा)**

**प्रति,**

राज्यपालांचे सचिव,राजभवन,मलबार हिल,मुंबई,

मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव,
सर्व मंत्रालयीन विभागांचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग,
* प्रबंधक,मूळ शाखा,उच्च न्यायालय,मुंबई ,
* प्रबंधक,अपील शाखा,उच्च न्यायालय,मुंबई,
* प्रबंधक,लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय,मुंबई,
* सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई ,
* सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा) मुंबई,
* सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानपरिषद) मुंबई,
* राज्य निवडणूक आयुक्त,राज्य निवडणूक आयोग,नवीन प्रशासकीय भवन, मुंबई,
* महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र, मुंबई,
* महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
* महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र, नागपूर,
* महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व परीक्षा),महाराष्ट्र, नागपूर,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय,मुंबई, (२ प्रती प्रसिध्दीकरिता)
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
निरनिराळया मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवडनस्ती,
*पत्राने.

---